**राज्यातील सामाजिक कार्यकर्त्यांनी मागणी केल्यास द्यावयाच्या पोलीस संरक्षणाबाबत मार्गदर्शक तत्वे.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
शासन परिपत्रक क्र. सीआरटी -२०१०/प्र.क्र. ६४/पोल-११
दिनांक .- ०९/ ०२/२०१०

राज्यातील विविध भागातील सामाजीक कार्यकर्ते त्यांच्या क्षेत्रात कार्य करीत असतांना विशिष्ट कामात हितसंबंध गुंतलेल्या समाज कंटकांकडून अशा सामाजीक कार्यकर्त्यांवर प्राणघातक हल्ले होण्याच्या घटना घडतात. अशावेळी अशा कार्यकर्त्यांना पुरेसे पोलीस संरक्षण नसल्यास अशा घटनांत त्यांचा मृत्युही होण्याच्या घटना घडतात. भविष्यात अशा घटना होऊ नयेत म्हणून अशाच एका प्रकरणी राज्य शासनाने सामाजिक कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांनी मागणी केल्यास, परिस्थितीचे गांभीर्य विचारात घेऊन त्यांना पोलीस संरक्षण देण्यात येईल. अशा आशयाचे प्रतिज्ञा पत्र उच्च न्यायालय, मुंबई येथे सादर केले आहे. त्या अनुषंगाने, राज्यातील जे सामाजिक कार्यकर्ते प्रामाणिकपणे सामाजिक हितासाठी कार्य करत असतील अशा सामाजिक कार्यकर्त्यांनी पोलीस संरक्षणाची मागणी केल्यास त्यांना पोलीस संरक्षण देण्याबाबत खालील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करण्यात यावा.

१) सामाजिक कार्यकर्त्यांकडून मागणी/तक्रार मिळताच कर्तव्यावर असणाऱ्या अधिकाऱ्याने त्याची सूचना पोलीस ठाण्याच्या प्रभारी अधिकाऱ्यांना द्यावी आणि सदर तक्रार प्रसंगानुरूप प्रथम खबरी अहवाल (FIR) किंवा अदखलपात्र गुन्हा म्हणुन नोंद करण्यात यावी आणि त्याबाबत मागणी/तक्रार करणाऱ्यास तसे लेखी स्वरूपात कळविण्यात यावे.

२) अशा प्रकरणी पोलीस ठाण्याचे एका जबाबदार अधिकारी यांनी चौकशी करावी व आवश्यक त्या प्रकरणी मा. न्यायालयाच्या पूर्व परवानगीने एन.सी. बाबतचाही तपास करावा.

३) जेंव्हा आरोपीस अटक करणे आवश्यक असेल तेव्हा त्यांना कायदेशीररित्या अटक करावी. घटनेच्या कटाबाबतचा दृष्टीकोन व सत्यते बाबत सखोल तपास/चौकशी करावी.

४) आवश्यक त्या प्रकरणी फौजदारी प्रक्रिया संहिता कलम १०७, ११०, १५१, तसेच मुंबई पोलीस कायदा कलम ५५, ५६, ५७ अनुसार प्रतिबंधात्मक कार्यवाही करण्यात यावी.

ROTA/H 2512 (500-2-10)

५) ज्या ठिकाणी सामाजिक कार्यकर्त्यांकडून पोलीस संरक्षणाची मागणी करण्यात येईल अशा वेळी संबंधीत पोलीस ठाण्याकडून, धमकीचा संवेदनशीलता अहवाल तात्काळ तयार करून विहित मार्गाने संबंधीत पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक यांना मंजूरीसाठी विनाविलंब सादर करण्यात यावा.

६) याबाबत अधिक चांगल्या समन्वयासाठी, स्थानिक प्रकरणाचा तात्काळ निपटारा होण्याच्या दृष्टीने समाजात विविध स्तरांवर कार्य करणाऱ्या स्थानिक पातळीवरील सामाजिक कार्यकर्त्यांचा समावेश, पोलीस - जनता समन्वय समितीत करण्यात यावा.

७) प्रकरणाच्या गुणवत्ते नुसार पोलीस अधीक्षक/पोलीस उपआयुक्त तसेच आवश्यकतेनुसार विशेष पोलीस महानिरीक्षक / पोलीस आयुक्त हे अशा प्रकरणांचा तपास / चौकशीबाबतच्या प्रकरणांचा कालबध्द आढावा घेतील कार्यकर्त्यांच्या संरक्षणाबाबत उचित / योग्य मार्गदर्शन करतील अशा प्रकरणी तात्काळ कार्यवाही करण्याबाबत सर्व संबंधीत अधिका-यांनी नेहमी दक्ष / सर्तक रहावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

( नं. म. शिंदे)
शासनाचे उपसचिव

प्रत.

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक,
प्रधान सचिव (विशेष) गृह, यांचे स्वीय सहायक,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व पोलीस आयुक्त/उपआयुक्त
सर्व पोलीस अधीक्षक/उपअधीक्षक

H- 25-12